घरबांधणी अग्रीम मंजूर करण्यासाठी
सर्व औपचारिक बाबी पूर्ण करणा-या
शासकीय कर्मचा-यांना अग्रक्रम तत्वावर
घरबांधणी अग्रीम मंजूर करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
वित्त विभाग
परिपत्रक क्रमांक एफएनआर १०८३/सीआर-७६३/जीईएन-५
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक २१ फेब्रुवारी १९८४

## प रि प त्र क

शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक एफएनआर-१०६३/१२७४/५१६/सात, दिनांक ४ जानेवारी १९६९ च्या परिच्छेद ४ नुसार शासकीय कर्मचा-यांना निरनिराळी अग्रीमे काटेकोरपणे त्या त्या प्रतिक्षासूचीवरील त्यांच्या क्रमानुसार मंजूर केली जातात. यामुळे काही वेळा हा अग्रीम निधी प्रत्यार्पित करावा लागला आहे असे निदर्शनास आले आहे. याचे कारण असे की, प्रतिक्षासूचीवरील ज्येष्ठ कर्मचारी अग्रीम मंजूर करण्यासाठी आवश्यक असलेल्या सर्व औपचारिक बाबी पूर्ण करु शकत नाहीत आणि ज्या प्रयोजनासाठी अग्रीम मंजूर करावयाचा त्या प्रयोजनासाठी तो अग्रीम उपयोगात आणू शकत नाहीत आणि म्हणून त्यांना अग्रिम मंजूर करणे शक्य होत नाही. दुस-या बाजूस, जे कर्मचारी अग्रीम मंजूर करण्यासाठी आवश्यक असलेल्या सर्व औपचारिक बाबी पूर्ण करु शकतात आणि अग्रीम मंजूर करण्यास सर्वथैव पात्र आहेत अशा कर्मचा-यांना, ते प्रतिक्षासूचीवर कनिष्ठ आहेत म्हणून अग्रीम मंजूर करता येत नाही आणि म्हणून त्यांना वर्षानुवर्षे वाट पहावी लागते अथवा अन्य पर्यायी व्यवस्था करावी लागते. याचा परिणाम असा होतो की, विभागांना मंजूर झालेला निधी पूर्णपणे उपयोगात आणला जात नाही आणि प्रतिक्षासूची वाढतच जाते.

२. म्हणून शासन असा निदेश देत आहे की, अग्रीम मंजूर करण्यासाठी तयार करण्यात आलेल्या प्रतिक्षासूची उपरोक्त आदेशानुसार ठेवाव्यात व त्याचे क्रमानुसार पालन केले जावे. तथापि प्रतिक्षासूचीवर कनिष्ठ असलेल्या कर्मचा-यांनी जर अग्रीम मंजूर करण्यासाठी आवश्यक असलेल्या सर्व बाबी पूर्ण केलेल्या असतील तर त्यांना अग्रीम मंजूर करण्यात यावे. मात्र प्रतिक्षासूचीवरील ज्येष्ठ कर्मचारी अग्रीम मंजूर करण्यासाठी आवश्यक असलेल्या बाबी पूर्ण करु शकत नसतील आणि त्यामुळे अग्रीम निधी प्रत्यार्पित करावा लागत असेल तरच हा मार्ग अनुसरावा. अशा वेळी ज्येष्ठ कर्मचा-याचे नाव प्रतिक्षासूचीवर त्याच्या क्रमामध्ये कोणताही बदल न करता चालू ठेवले पाहिजे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

राजकुमारी मुत्रेजा,
कार्यासन अधिकारी,
वित्त विभाग.